# स्वप्न साकार करताना

# मेरी बेथ्युनची शाळा

रिचर्ड केल्सो, संपादक : ॲलेक्स हेली
अनुवाद : सुजाता गोडबोले



# प्रस्तावना

आजकाल तुम्ही जर शाळेत जाण्याच्या वयाचे असाल, तर शाळेत जाणे ही एक सर्वसामान्य गोष्ट आहे. पण पूर्वी तसे नव्हते. विसाव्या शतकाच्या सुरुवातीला, अनेक अमेरिकन लोकांसाठी हे फार तर एक स्वप्नच होते. त्यातून तुम्ही जर गरीब, मुलगी, आणि आफ्रिकी वंशाच्या असाल, तर मग पहायलाच नको. तुमच्यासाठी शाळेत जाणे अशक्यच होते.

पण तरीही काही लोक स्वप्न पाहत असत. मेरी मॅक्लिओड बेथ्यून गरीब होती, मुलगी होती आणि आफ्रिकी वंशाचीही होती पण तिने आपल्या स्वप्नाचा पाठपुरावा केला आणि इतरांनाही त्यात सामावून घेतले. ही तिचीच गोष्ट आहे.

श्रीमती बेथ्यून सारख्या स्वप्न पाहणाऱ्या महिला जे काही साध्य करतात त्यापेक्षा कितीतरी अधिक त्या इतरांना देतात. त्या स्वतःचे उदाहरण जगासमोर ठेवतात. आपल्या उदाहरणातून त्या जगाला शिकवतात की स्वप्न पाहणे ही कोणतीही अशक्यप्राय गोष्ट साध्य करण्याची पहिली पायरी आहे. म्हणून तुमच्यासमोर जर काही स्वप्न असेल, तर त्याचा पाठपुरावा करा. अशक्य वाटणारी गोष्ट प्रत्यक्षात आणा.

ऍलेक्स हेली

संपादक

माझी आजी
जोबर्नेस  हेझल रेडमन केल्सो
हिला समर्पित

# अनुक्रमणिका

# प्रकरण १

# शिकण्याची संधी

फ्लोरिडा राज्यातील डेटोना बीच स्टेशनवर येताना आगगाडीने एक लांबलचक शिटी वाजवली. रेल्वेच्या रुळांजवळच्या धुळीने भरलेल्या मोकळ्या मैदानात आफ्रिकी वंशाची काही मुले-मुली खेळत होती. गाडी जशी जवळ आली, तशी ही मुले गाडीतील प्रवाशांकडे पाहत, त्यांना 'टाटा' करत पळून गेली.

आगगाडीच्या एका खिडकीतून मेरी मॅक्लीओड बेथ्यून आणि त्यांच्या चार वर्षांच्या मुलाने- अल्बर्टनेही- त्या मुलांना 'टाटा' केला. मुले पाहून त्यांना आनंद झाला पण त्याचबरोबर त्यांची काळजीही वाटली. ह्या मुलांनी खरे तर आता शाळेत बसून लिहायला आणि वाचायला शिकायला हवे असा विचार त्यांच्या मनात आला. मोठेपणी काहीतरी चांगला काम-धंदा करता येईल असे शिक्षण मुलांना मिळावे असे त्यांना वाटे.



त्यासाठीच त्या १९०४ सालच्या सप्टेंबर महिन्यातील एका उकाड्याच्या दिवशी डेटोना बीचला आल्या होत्या.

मेरी बेथ्यून या एक तरुण शिक्षिका होत्या. १९०४ साली अमेरिकेतील दक्षिणेकडील बहुतेक सर्व शहरांमध्ये गोऱ्या आणि काळ्या मुलांसाठी स्वतंत्र शाळा आहेत हे त्यांना माहित होते. त्यावेळी या दोन्ही वंशाच्या मुलांनी एकाच शाळेत जाणे हे कायद्याविरुद्ध होते. काही शहरांमध्ये गोऱ्या मुलांसाठी शाळा होत्या पण काळ्या मुलांसाठी शाळाच नव्हत्या, त्यामुळे ही मुले शाळेत जाऊच शकत नव्हती. याचा बेथ्यूनना फार राग येत असे. त्याबाबत आपण काही तरी करायचे असा त्यांनी निश्चय केला. काळ्या मुलांसाठी त्यांना अधिक शाळा हव्या होत्या, आणि त्या शाळा चांगल्या असायला हव्या होत्या.

आताच त्यांनी आगगाडीच्या खिडकीतून धुळीत खेळणारी  मुले पहिली होती, लहानपणी मेरी देखील तशाच होत्या. वयाच्या ११ वर्षांपर्यंत त्या  शाळेत गेल्याच नव्हत्या.  त्यांच्याहून मोठी असणारी त्यांची १४ भावंडे देखील कधी शाळेत गेली नव्हती.

मेसव्हील या दक्षिण कॅरोलिना मधील त्यांच्या गावी त्याकाळी काळ्या मुलांसाठी शाळा नव्हती.

*****

पण नंतर  ते बदलले होते. मेरी भाग्यवान होती. तिला आता शाळेत जाता  येईल असे तिने  ऐकले, तो दिवस त्यांना आताही आठवत होता. श्री. आणि श्रीमती मॅक्लिओड हे तिचे आई-वडील शहरातून घरी आले ते एक आनंदाची बातमी घेऊन. त्यांच्यापासून केवळ ५ मैल अंतरावर काळ्या मुलांसाठी एक शाळा उघडण्यात आली होती.   ही बातमी तिने ऐकली, तेव्हा तिचा चेहरा आंनदाने उजळून निघाला. शाळेत जाण्याचे   तिचे  स्वप्न आता खरे ठरणार होते. पण मेरीशिवाय घरच्या मळ्याचे काम सांभाळता येईल का याचा त्यांना आधी विचार करायचा होता.

बराच विचार केल्यावर त्यांनी ठरवले की मेरी सर्व भावंडांमध्ये लहान असल्याने  शाळेच्या वेळेत तिने मळ्यावर काम नाही केले तरी चालू शकेल. पण तिची घरातील इतर कामे मात्र तिने उरलेल्या वेळात केली पाहिजेत. आणि तिला चालत शाळेत जावे लागेल. तिला शाळेतून नेण्या-आणण्यासाठी कोणालाच वेळ नव्हता.

मग पुढील ६ वर्षे मेरी मॅक्लिओड गावातील कच्च्या रस्त्यावरून रोज ५ मैल चालत एका खोलीच्या शाळेत जात राहिली.

मेरी हुशार होती, ती शाळेत खूप लवकर शिकू लागली आणि घरी आल्यावर ती शाळेत जे काही शिकली असेल ते तिच्या घरच्यांना आणि शेजार-पाजारच्यांना शिकवू लागली. लवकरच, मेसव्हीलमधील लोक - काळे आणि गोरे देखील - आपली पत्रे वाचून घ्यायला तिच्याकडे येऊ लागले. त्यांनी पिकवलेल्या कापसाचे वजन किती आहे ते पाहून त्याची किंमत ठरवण्यासाठीही ती लोकांना मदत करू लागली. दुकानदाराला किती पैसे द्यायचे यासाठीचा हिशेब देखील त्यांना करून देऊ लागली.

त्यानंतर शिक्षकांना प्रशिक्षण देणाऱ्या उत्तर कॅरोलिनातील एका कॉलेजमध्ये जाण्यासाठी तिला शिष्यवृत्ती मिळाली. तिची जाण्याची वेळ आली, तेव्हा मेसव्हील गावातले सगळे लोक तिला निरोप द्यायला आले. त्यांना तिचा अभिमान वाटत होता. तिने त्यांना मदत केली होती, म्हणून आता त्यांना तिला मदत करायची होती.

काहींनी तिच्यासाठी कपडे शिवून आणले. कोणी तिच्या मोठ्या प्रवासासाठी शिदोरी बांधून आणली. सर्वांनी तिला आशीर्वाद दिले.

उत्तर कॅरोलिनात गेल्यावर मेरीने कसून अभ्यास केला. अनेक विषयांवरील बरीच पुस्तके तिने वाचली. जगाबद्दल शिकता येईल तेवढे सर्व तिने शिकून घेतले. त्याचबरोबर शेतीकाम, शिवणकाम, घर चालवणे, आजारी लोकांची शुश्रूषा, मुलांना वाढवणे आणि शिकवणे याबाबतही मिळेल तेवढी माहिती तिने मिळवली. आपल्याकडील ज्ञान इतरांना देण्याइतपत तयारी झाल्यावर मेरी शिक्षिका झाली.

मेसव्हील मधील ज्या शाळेत मेरी लहानपणी शिकत होती त्याच शाळेत ती प्रथम शिक्षिका म्हणून काम करू लागली. त्यानंतर ती जॉर्जिया प्रांतातील ऑगस्टा नावाच्या गावी मिस ल्युसी लेनी यांनी काळ्या मुलींसाठी एक शाळा सुरु केली होती, तिथे त्यांची मदतनीस म्हणून रुजू झाली. लेनी यांच्या शाळेवरूनच मेरीला आपली स्वतःची शाळा सुरु करण्याची कल्पना आली.

लेनी यांच्या शाळेत एक वर्षभर काम केल्यानंतर मेरीची अल्बेर्टस बेथ्यून या शिक्षकांशी ओळख झाली आणि त्यांनी विवाह केला. ते दोघे फ्लोरिडा प्रांतातील पलातका येथे राहू लागले आणि मेरीने दोन वर्षे तेथील चर्चच्या शाळेत शिकवण्याचे काम केले.

परंतु लेनी यांच्या शाळेची कल्पना त्यांच्या मनात घोळत होती. आपली स्वतःची शाळा सुरु करण्यासाठी त्या जागेचा शोध घेऊ लागल्या.

फ्लोरिडाच्या पूर्व किनाऱ्यावर आगगाडीचा मार्ग तयार करण्याच्या कामासाठी अनेक काळ्या मजुरांची भरती करण्यात आली होती असे त्यांना समजले. बरेचसे काम डेटोना बीचच्या आजूबाजूच्या परिसरात चालू होते. या मजुरांबरोबर त्यांची कुटुंबेही आली असणार आणि त्यांच्या मुलांसाठी शाळेची गरज असणार हे ही बेथ्यून यांच्या लक्षात आले होते. म्हणून डेटोना बीच हे नवी शाळा सुरु करण्यासाठी योग्य ठिकाण आहे असे त्यांना वाटले. आगगाडी त्या गावात शिरत असतानाच रुळांजवळ खेळणारी मुले पाहून आपला निर्णय योग्य आहे याबद्दल त्यांची खात्री पटली.

*****

पण मेरी बेथ्यून यांनी यापूर्वी कधीच स्वतःची शाळा काढली नव्हती. शाळेसाठी इमारत त्यांना कुठे मिळणार? शाळेसाठी बाके, खुर्च्या वगैरे जे सामान लागणार होते, ते कोठे मिळणार? लोक आपली मुले त्यांच्या शाळेत पाठवतील का?

आगगाडी थांबत असताना त्यांच्या मनात अशा अनेक प्रश्नांचे काहूर माजले होते. परंतु आपण यातून काही तरी मार्ग काढू अशी त्यांना खात्री वाटत होती. ते त्यांचे स्वप्न होते आणि ते त्यांना प्रत्यक्षात आणायचे होते.

# प्रकरण २

## कचऱ्याच्या डेपो जवळचे एक जुने घर

डेटोनातील काळ्या लोकांच्या वस्तीतील एका लहानशा लाकडी घराचे दार मेरी बेथ्यून यांनी  ठोठावले. तीन मुलींनी ते दार उघडले आणि दारात एक अनोळखी बाई आणि त्यांचा लहान मुलगा पाहून त्या आश्चर्याने हसू लागल्या. या मुली होत्या लेना, ल्युसिल आणि रूथ वॉरेन.

तेवढ्यात त्या मुलींची आई, श्रीमती वॉरेन,  दाराशी आल्या. कोणी पाहुणे येतील अशी त्यांची अपेक्षा नव्हती, तरी त्यांनी बेथ्यून यांचे स्वागत केले पण त्यांच्या चेहऱ्यावर संभ्रम स्पष्ट दिसत होता. मेरी बेथ्यून यांनी आपली ओळख करून दिली आणि सांगितले की फ्लोरिडातील पलातकाच्या रेव्हरंड प्रॅटनी त्यांना त्यांच्याकडे पाठवले  होते.

बेथ्यूननी सांगितले की त्यांना निग्रो मुलींसाठी एका शाळा सुरु करायची होती. कदाचित शाळा सुरु होईपर्यंत त्यांना वॉरेन यांच्या घरी राहता येईल असेही रेव्हरंड प्रॅट यांनी सुचवले होते.

रेव्हरंड प्रॅट यांचे नाव ऐकल्यावर वॉरेन यांच्या चेहऱ्यावरचा संभ्रम दूर झाला आणि त्यांनी हसतमुखाने मेरी यांचे स्वागत केले. मेरी बेथ्यूनना त्यांनी घरात बोलावले आणि त्या दोघी बोलू लागल्या. थोड्याच वेळात सर्व काही ठरवण्यात आले. वॉरेन यांच्या मुलींनी आपली खोली मेरी आणि अल्बर्टना देण्याचे कबूल केले.

मेरी बेथ्यून भारावून गेल्या. आगगाडीच्या प्रवासाने दमल्या असल्या तरीही एवढ्यातच त्यांना झोप येणार नव्हती. आता तर काम सुरु करायचे होते. त्या वॉरेनना म्हणाल्या की त्यांना आता शाळेसाठी एक इमारत शोधायची होती. “मला अशी एखादी जागा भाड्याने देऊ शकेल असे कोणी तुम्हाला माहित आहे का?”

वॉरेननी थोडासा विचार केला. मग त्या म्हणाल्या की विल्यम्स नावाचे एक सुतार आहेत आणि पाम स्ट्रीटवर कचऱ्याच्या डेपोजवळ त्यांची एक जुनी जागा आहे आणि ती त्यांना भाड्याने द्यायची आहे असे त्यांना वाटते. बेथ्यूननी लगेच ती जागा पाहायला जायचे ठरवले.

विल्यम्स यांच्या जागेकडे जाताना गोरे लोक रहात असलेला परिसर आणि काळ्या लोकांची वस्ती यात केवढा मोठा फरक आहे हे त्यांना प्रकर्षाने जाणवले. काळ्या लोकांच्या वस्तीतील रस्ते कच्चे होते, त्यात चिखल आणि मोठे खड्डे होते. पायी जाणाऱ्यांसाठी पदपथ तसेच रस्त्यावर दिवे देखील नव्हते. ही सर्व सोय स्थानिक प्रशासनाने करायला हवी होती, पण इथे राहणारे लोक काळे आणि गरीब होते म्हणून त्यांनी त्याकडे लक्ष दिले नव्हते.

मधूनच कुठेतरी एखादे टुमदार, छान रंगवलेले घर दिसायचे, पण बहुतेक घरे पडकी आणि झोपडीवजाच होती. त्यात पाण्याचे नळ देखील नव्हते.

डेटोना बीचच्या गोरे लोक राहत असलेल्या भागात छान मोठाली घरे आणि दिमाखदार हॉटेले होती. सुरेख बांधणीचे रस्ते होते आणि रस्त्यांवर गॅसच्या दिव्यांची सोय देखील होती. कधीतरी त्यांच्या लोकांना सुद्धा अशा सुविधा असलेल्या सुंदर घरांत राहता येईल अशी त्यांना आशा होती. स्थानिक सरकार गोऱ्या लोकांना जशी मदत करायचे, तसे ते काळ्यांना करत नसत. त्यांना सर्व गोष्टी स्वतःच कराव्या लागत असत. पण त्यासाठी त्यांना चांगल्या नोकऱ्या मिळणे गरजेचे होते. आणि त्यासाठी प्रथम चांगल्या शाळांची गरज आहे हे मेरी बेथ्यूनना पक्के माहित होते. म्हणूनच त्यांना त्यांच्या लोकांसाठी चांगली शाळा सुरु करायची होती.

त्या जेव्हा विल्यम्स यांच्या जुन्या, मोडकळीस आलेल्या घराशी पोचल्या, तेव्हा विल्यम्स दाराशीच बसले होते.

“नमस्कार”, त्या म्हणाल्या. “मी मेरी बेथ्यून.” त्या म्हणाल्या की वॉरेन यांनी त्यांना सांगितले होते की, त्यांच्याकडे भाड्याने जागा मिळू शकेल. या जागेचे भाडे काय असेल असेही त्यांनी विल्यम्सना विचारले.

“मी दरमहा ११ डॉलर्स भाड्याने ही जागा तुम्हाला देईन.”

बेथ्यून यांनी आपली पर्स उघडून पहिले. खरे तर त्याची काहीच गरज नव्हती, कारण त्यांच्याकडे नेमके किती पैसे आहेत हे त्यांना माहित होते. त्यांच्याकडे बरोबर १ डॉलर आणि ५० सेंट होते, त्याहून अधिकचा एक पैसाही नव्हता! पण हे त्यांना विल्यम्सना कळू द्यायचे नव्हते. थोडा वेळ आपल्या पर्समध्ये चाचपणी केल्यावर त्यांनी ५० सेंट विल्यम्स यांच्या हातावर ठेवले.

“धन्यवाद, सर.” त्या म्हणाल्या. आणि त्यांनी हसतच विल्यम्सना सांगितले, की तो घरभाड्याचा पहिला हप्ता होता आणि राहिलेले १० डॉलर आणि ५० सेंट त्या महिना अखेरीस देतील.



विल्यम्स काही बोलण्यासाठी तोंड उघडणार होते कारण अजून त्यांना थोडीफार घासाघीस करायची होती! पण ते काही बोलण्यापूर्वीच बेथ्यूननी दार उघडले आणि त्या घरात शिरल्या. त्यांच्या मते त्या दोघांमध्ये करार झाला होता आणि आता ती जागा त्यांना मिळाली होती.

आता त्यात काय काय काम करून घ्यायला हवे ते पाहण्याची वेळ आली होती. संपूर्ण जागेला प्रथम रंग देण्याची जरूर होती. त्यात खालच्या मजल्यावर चार आणि वरच्या मजल्यावर तीन खोल्या होत्या. एक शेकोटीची जागा होती, पण त्यांना एक शेगडीही आणावी लागणार होती. खिडक्या चांगल्या स्थितीत होत्या. सगळीकडे धूळ आणि कोळ्याची जाळी पसरली होती. पण त्या आता खूपच उल्हसित झाल्या होत्या आणि ही  जागा लवकरच वापरण्याजोगी होईल याची त्यांना खात्री वाटू लागली होती.

त्या परत दाराशी आल्या आणि तुटलेल्या पायऱ्यांकडे त्यांचे लक्ष गेले. त्या पण दुरुस्त कराव्या लागणार होत्या. मग आणखी कशाचाच विचार न करता त्यांनी विल्यम्सचा निरोप घेतला आणि त्या घाईनेच तिथून निघाल्या.

बेथ्यूनना  आता जागा तर मिळाली होती, पण शाळा सुरु करण्यापूर्वी बरीच तयारी करावी लागणार होती.

पण त्यांना त्याची काळजी वाटत नव्हती. त्यांचा स्वतःवर विश्वास होता. आपल्या स्वप्नांवर विश्वास होता. आपल्या लोकांवर विश्वास होता आणि देवावर विश्वास होता. यातून काहीतरी मार्ग निघेल अशी त्यांना खात्री वाटत होती.

बेथ्यूननी  आता अजिबात वेळ दवडला नाही. आजूबाजूच्या घरी जाऊन त्यांनी आपल्या शाळेबद्दल सांगायला सुरुवात केली. रविवारी चर्चमध्ये जाऊन तिथेही याबाबत बोलायला सुरुवात केली. कुठेही एखादे दार दिसले की  त्या ते ठोठावत असत. रस्त्याच्या बाजूला दोन लोक जरी उभे असले, तरी त्या त्यांच्याकडे जात. त्या आता लाजाळू राहिल्या नव्हत्या.

“माझी शाळा ही मुलींची शाळा असेल” असे त्या सांगत. कारण चांगली नोकरी मिळण्यासाठी मुलग्यांपेक्षाही मुलींना अधिक मदतीची गरज होती असे त्यांचे मत होते. मुले शेतावर काम करता करता जी कौशल्ये शिकत त्यामुळे त्यांना मळ्यात किंवा लोहमार्ग बनवण्यासाठी मजूर म्हणून काम मिळणे सहज शक्य होत असे. त्या काही फार चांगल्या नोकऱ्या होत्या असे नव्हे, पण मुलींना शिक्षण किंवा विशेष कौशल्य नसताना ज्या नोकऱ्या मिळणे शक्य होते त्यापेक्षा मुलांना या कामांवर अधिक पैसे मिळत असत.

“ही नव्या प्रकारची शाळा असेल, माझ्या शाळेतील मुलींना मी कलाकौशल्ये आणि घरासाठी उपयुक्त असे शिक्षण देणार आहे” असे त्या सांगत असत. “रोजगार मिळण्यास उपयोगी पडेल असे शिक्षण मी देणार आहे. आपली बुद्धी, हात आणि चांगुलपणा कसा वापरायचा हे मी त्यांना शिकवणार आहे. त्या बुद्धी वापरून विचार करतील, हाताने काम करतील आणि त्यांच्या हृदयात श्रद्धा आणि विश्वास असेल.” त्यांचे बोलणे लोक ऐकून घेत असत आणि त्या जे सांगत होत्या ते त्यांना पटत होते.

बेथ्यून बाई ज्या लोकांशी बोलत होत्या, त्यांच्याकडे फारसे पैसे नव्हते , पण बाईंनी मदत मागितली की ते मदत करत असत. ते आपल्या घरातील आणि बागेतील अन्नधान्य देत. मासे आणि कोंबडीचे पदार्थ तयार करून ते विकून आलेले पैसे ते शाळा सुरु करण्यासाठी मदत म्हणून देत असत.

बरोबर मुले असलेले लोक भेटले की त्या त्यांना शाळेत पाठवायची विनंती करत असत. आठवड्याला त्या ५० सेंट इतकीच फी घेत असत. जर ती देखील त्यांना परवडत नसेल, तरीही मुलींना शाळेत पाठवा असेच सांगत असत. खर्चाची तोंडमिळवणी करण्याचा काहीतरी मार्ग निघेल असा त्यांचा विश्वास होता.

त्या गोऱ्या लोकांच्या भागातही जात असत. दारावरची घंटी वाजवून जे कोणी भेटेल, त्यांच्याशी त्या बोलत असत.

त्या गोऱ्या लोकांच्या चर्चमध्ये, त्यांच्या क्लबमध्ये, अशा कोणत्याही ठिकाणी जात. प्रत्येक ठिकाणी त्या पैसे, अन्नधान्य, जुने फर्निचर, कपडे, किंवा शाळेसाठी उपयोगी पडेल असे काहीही देण्याची विनंती करत असत. काही लोक मदत करत पण अनेकदा लोक त्यांचे म्हणणे ऐकून घेण्यासही तयार नसत. काही उद्धटपणे वागत. पण बेथ्यून बाई नेहमी नम्रतेनेच बोलत. “तुमचा वेळ दिलात त्याबद्दल धन्यवाद” असे शांतपणे म्हणून त्या निघून जात.

अनेक दिवस त्या लोकांना आपल्या शाळेबाबत सांगत होत्या. अनेक दिवस त्या आलिशान हॉटेलांच्या मागच्या बाजूच्या कचऱ्याकडे आणि शाळेजवळच्या कचरा डेपोकडे जात राहिल्या. रिकामे डबे आणि खोकी त्या मागून आणायच्या. लाकडाच्या तुटक्या फळ्या, मोडक्या खुर्च्या, जुने कपडे आणि फुटकी भांडी त्यांना सापडायची.

या सर्व गोष्टी त्या जुन्या घरात घेऊन जायच्या आणि त्यांची दुरुस्ती करायच्या. पुठ्ठ्याच्या खोक्यांची त्यांनी बाके बनवली. संत्र्यांच्या जुन्या खोक्यांचा बसण्यासाठी वापर केला. एक मोठे खोके बनले त्यांचे टेबल. उलट्या करून ठेवलेल्या एका पिंपावर त्या बसायच्या. शेजाऱ्यांनी त्यांना जमीन आणि खिडक्या स्वच्छ करायला, आणि या जागेला आतून- बाहेरून रंगवायला मदत केली.

थोड्याच आठवड्यांत ही जुनी जागा शाळेसारखी दिसू लागली. पण शाळेची अशी तयारी सुरु असतानाच त्यांच्यासमोर नव्या समस्या उभ्या राहिल्या. केवळ पहिल्या महिन्याचे भाडे देता येईल इतकेच पैसे त्यांना मिळाले होते. शाळा चालू ठेवण्यासाठी अन्नधान्य आणि इतर सामान विकत घ्यावे लागणार होते, आणि त्यांच्याकडे फक्त एकच डॉलर शिल्लक राहिला होता. आता काय करायचे? ते त्यांना माहित नव्हते, पण काहीतरी मार्ग निघेल असा त्यांना विश्वास वाटत होता.



## प्रकरण ३

## शाळेसाठी खाऊची विक्री आणि गाणी

बेथ्यूनबाई लोहमार्गावर काम करणाऱ्या लोकांचा विचार करत होत्या. त्यांच्या मनात डेटोनामधील आणि आलिशान हॉटेलात राहणाऱ्या श्रीमंत लोकांचाही विचार आला. शाळा चालवण्यासाठी पैसे कसे मिळवावेत याचाच त्या विचार करत होत्या. त्यांना एक कल्पना सुचली.

“पाय” (एक प्रकारचा गोड पदार्थ)! रताळ्याचा गोड पदार्थ बनवून तो विकायचा. त्यासाठी काय काय लागेल याचा त्या विचार करू लागल्या.  “पाय” बनवण्याचे साचे, रताळी शिजवण्यासाठी मोठे भांडे, मैदा, लोणी, अंडी आणि साखर. हे सर्व घेण्यासाठी एक डॉलर पुरेसा नव्हता.  पण जे विकत घेता येणे शक्य नव्हते, ते त्या उधार घेऊ शकतील. काही तरी मार्ग सापडेलच.

वॉरेन यांनी मैदा आणि लोणी उधार दिले. मग दुकानात जाऊन बेथ्यूनबाईंनी आपला अखेरचा डॉलर खर्च करून साचे, मोठे भांडे, अंडी, साखर आणि रताळी विकत घेतली. प्रत्येक वस्तू वेगवेगळी बांधून द्यायला त्यांनी दुकानदाराला सांगितले. शाळा सुरु झाली की हा कागद मुलींना लिहिण्यासाठी वापरता येणार होता.

आता बेथ्यूनबाईंना शाळेसाठी पैसे जमवण्याचा एक मार्ग सापडला होता. त्यांनी केलेले “पाय” चांगले विकले जाऊ लागले. शाळा सुरु करण्यासाठी जरूर ती रक्कम आता त्यांच्याकडे जमली.

४ ऑक्टोबर १९०४ रोजी, शक्य तितक्या नीटनेटक्या केलेल्या या लाकडी घराच्या दारात बेथ्यूनबाई उभ्या राहिल्या. दाराबाहेर ॲन, सेलेस्ट, लेना, ल्युसिल आणि रूथ  या ८ ते १२ वर्षांच्या वयोगटातील ५ मुली शाळेत पाऊल टाकण्याची वाट पाहत उभ्या होत्या. त्या गरीब घरातील होत्या आणि  अनवाणीच आल्या होत्या, त्यांच्या कपड्यांना अनेक ठिगळे लावलेली होती. पण शाळेत जाता येणार म्हणून त्या खूष होत्या.



बेथ्यूनबाईंनी एक लहानशी घंटी वाजवली आणि प्रत्येक मुलीचे नाव घेतले. एकेक जण आत आल्या तसे बाईंनी त्यांचे स्वागत केले, “गुड मॉर्निंग, मी आहे बेथ्यूनबाई. आत या. मी तुमचीच वाट पाहत होते. तुम्हाला इथे यायला  आवडेल अशी मला आशा आहे.”

सगळ्या मुली आपल्या खोक्याच्या बाकांशी आल्यावर बाईंनी एक प्रार्थना म्हटली. मग त्यांनी सर्व मुलींना आणि अल्बर्टला  एक प्रार्थना म्हणायला शिकवली.

बाई आता त्यांच्या उलट्या केलेल्या पिंपाच्या खुर्चीवर बसल्या. त्यांच्यासमोर त्यांचे खोक्याचे टेबल ठेवलेले होते, त्याला एक रंगीत कापड गुंडाळले होते. त्यांनी मुलींना शिकवायला सुरुवात केली. पेन्सिली ऐवजी त्या लाकडाच्या जळक्या काड्या  वापरत होत्या. छोट्या  बेरींचा रस होती त्यांची शाई. कोंबडीची आणि बदकांची पिसे म्हणजे त्यांचे पेन होते. किराणा दुकानातून सामान गुंडाळून आलेला कागद त्या अभ्यासाला वापरत होत्या. त्यांच्याकडे पुस्तके नव्हती, पण तरीही त्यांचा अभ्यास मात्र सुरु झाला होता.

मोठ्या झाल्यावर त्यांना ज्यामुळे चांगल्या नोकऱ्या मिळतील आणि स्वतःपुरते चांगले कमावता येईल, अशी कौशल्ये त्यांनी मुलींना शिकवली.

लिहिणे, वाचणे, अंकगणित या खेरीज त्यांनी मुलींना कविता पाठ करून म्हणायला आणि चित्रे काढून ती रंगवायला देखील शिकवले. त्याच बरोबर त्यांना स्वयंपाक करायला, नीट नेटके राहायला आणि आरोग्याची काळजी घ्यायलाही शिकवले. त्या कपडे शिवायला शिकल्या, तसेच झाडू आणि सतरंज्या बनवायला आणि जुन्या सामानातील फुटकी भांडी आणि फर्निचर दुरुस्त करायलाही शिकल्या. इतर कोठेही शिकता येणार नाहीत अशा अनेक गोष्टी त्या बेथ्यूनबाईंच्या शाळेत शिकल्या.

आता अधिकाधिक पालक आपल्या मुलींना बेथ्यूनबाईंच्या शाळेत पाठवू लागले. त्यापैकी फारच थोडे दर आठवड्याची फी देऊ शकत होते. मग बेथ्यूनबाई अधिकाधिक “पाय” बनवून विकू लागल्या आणि शाळेतल्या मुली त्यांना त्यात मदत करू लागल्या. तरीही, शाळा जसजशी वाढू लागली, तसा तिचा खर्चही वाढू लागला. शाळा चालवण्यासाठी जे सर्व सामान आणावे लागे त्याचा खर्च रताळ्याचे “पाय” विकून आलेल्या पैशातून भागेना.

मग बाईंनी पैसे उभे करण्यासाठी आणखी एक मार्ग शोधला. आपल्याला गाणी म्हणायला किती आवडते ते त्यांना आठवले. मिस लेनींच्या शाळेत शिकवत असताना त्या समूहगीतात भाग घेत असत. हा गाणारा गट चर्चमध्ये आणि लोकांच्या घरी देखील जाऊन गात असे. लोक त्यासाठी पैसे देत असत.



त्या पैशाचा उपयोग मिस लेनी शाळा चालवण्यासाठी करत असत. बेथ्यूनबाईंना वाटले की डेटोना बीचला एका चांगल्या "कोरस" (गाणारा समूह) ची गरज आहे आणि शाळेला पैशाची.

दुसऱ्या दिवशी बाईंनी शाळेत सांगितले की त्या आता एक "कोरस" सुरु करणार आहेत. त्यांना येणारी अनेक गाणी त्यांनी मुलींना शिकवली. आपली पणजी सोफिया हिच्याकडून लहानपणी शिकलेली अनेक गाणीही त्यांनी मुलींना शिकवली. त्यांची पणजी पश्चिम आफ्रिकेतील एका टोळी प्रमुखाची नात होती.

मुलींचा हा संच घेऊन बाई डेटोनामधील चर्च, हॉटेल, क्लब अशा ठिकाणी जाऊ लागल्या. गाण्यास सुरुवात करण्यापूर्वी बाई आपल्या शाळेविषयी माहिती सांगत असत. कार्यक्रमाच्या शेवटी त्या एक जुनी हॅट श्रोत्यांमधून फिरवत असत आणि लोक शाळेला मदत म्हणून त्यात पैसे टाकत असत.

आता अधिकाधिक लोक आपल्या मुलींना बाईंच्या शाळेत पाठवू लागले. १९०६ सालापर्यंत शाळेत जवळ जवळ २५० विद्यार्थी होते. शिकण्याची इच्छा असलेल्या कोणालाच त्या परत पाठवत नसत पण आता शाळेची जागा अपुरी पडू लागली होती. आता शाळेसाठी मोठी जागा आणि अधिक रकमेची गरज होती.

त्यांच्या जागेच्याच मागल्या बाजूला एका गोदाम होते. विल्यम्सनी आनंदाने ते शाळेसाठी भाड्याने दिले. पण त्याची डागडुजी करावी लागणार होती. परत एकदा शेजार-पाजारचे लोक आणि शाळेतल्या मुली त्यांच्या मदतीला धावून आल्या. परत एकदा बाईंना मार्ग सापडला होता.

## प्रकरण ४

# दलदलीच्या जागेचे झाले शाळेचे मैदान

बेथ्यूनबाई आता कामात इतक्या बुडून गेल्या होत्या की त्यांचे स्वप्न जरी साकार होत असले, तरी त्याचा विचार करायला देखील त्यांना आता वेळ नव्हता. तरीही एक दिवस त्यांनी शाळेच्या या दोन्ही जागांकडे नीट निरखून पाहिले. विद्यार्थिनी शाळेत येत-जात असलेल्या पाहून त्यांच्या चेहऱ्यावर समाधानाचे हसू झळकले. त्यांनी काळ्या मुलींसाठी शाळा सुरु केली होती आणि ती छान चालली होती. तरीही दर महिन्याची बिले भागवताना त्यांची धांदल उडत होती.

दर महिन्याला विल्यम्सना जागेचे भाडे द्यावे लागत होते. पण त्यांनी जर एखादी जमीन विकत घेतली, तर निदान भाडे तरी द्यावे लागणार नाही. कल्पना चांगली होती! जमीन त्यांची स्वतःची असेल, आणि त्यांना मग शाळेसाठी हवी तशी इमारत बांधता येईल.

मग त्यांनी गावात अशा जमिनीचा शोध घ्यायला सुरुवात केली. शाळेच्या लाकडी इमारतीच्या जवळच एक मोठी जागा विकायला असल्याचे त्यांना समजले. या जमिनीभोवती ओक वृक्षाची उंच झाडे होती. पण शेवाळ्याने वेढलेल्या झाडांच्या खाली दलदलीच्या जागेत तण आणि कचरा भरलेला होता! आणि किंमत! ती होती २५० डॉलर्स! पण बाई काहीच बोलल्या नाहीत. त्याऐवजी त्यांनी जमिनीची नीट पाहणी केली.

त्या या जागेकडे पाहत असताना दलदल आणि कचरा दिसेनासा होऊ लागला. त्याच्या जागी सुंदर हिरवळ आणि यॉर्कच्या उंच झाडांच्या सावलीत रंगीबेरंगी फुलांचे ताटवे बहरले. आणि या हिरवळीच्या मध्यावर लाल विटांची एक मोठी इमारत उभी राहिली -- त्यांची नवी शाळा. या जमिनीवर काय होऊ शकते हे त्यांना दिसले होते. आणि ते कसे घडवायचे याचा मार्गही निघणार होताच.

शाळेत परत जाऊन त्यांनी शिक्षकांशी, पालकांशी आणि विद्यार्थ्यांशी चर्चा केली. त्या म्हणाल्या की शाळेसाठी पैसे उभारण्यासाठी त्या एक आईसक्रीम पार्टी करणार होत्या. गावातील सर्वांना त्या त्यासाठी आमंत्रण देणार होत्या.

शाळेतील विद्यार्थी, शिक्षक आणि काही पालकांनी यासाठी अनेक दिवस भरपूर परिश्रम घेतले. त्यांनी मोठ्या प्रमाणावर आईसक्रीम आणि शेकडो “पाय” तयार केले. पार्टीच्या दिवशी गावातील सर्व लोक आले. “पाय”च्या एका तुकड्याची किंवा दोन मोठे चमचे भरून आईसक्रीमची किंमत होती एक पेनी.

पार्टी झाल्यावर बाईंनी सर्व चिल्लर गोळा करून एका हातरुमालात बांधून घेतली आणि त्या जागेचे मालक किन्सी यांच्याकडे गेल्या.

“जागेच्या किंमतीचा पहिला हप्ता म्हणून किती द्यायला हवेत?” बाईंनी विचारले.

“तुमच्याकडे किती आहेत?” किन्सीनी विचारले.

बेथ्यूनबाईंनी त्यांचा हातरुमाल उघडला आणि त्यातून ५ डॉलरची चिल्लर टेबलावर सांडली.

क्षणभर किन्सी त्या नाण्यांकडे पाहतच राहिले. “तुमच्याकडे एवढेच आहेत का?” असे विचारताना त्यांच्या कपाळावर आठ्या पडल्या होत्या.



"आज माझ्याकडे एवढेच आहेत, पण मी बाकी सगळेही देणार आहे." बेथ्यून आत्मविश्वासाने म्हणाल्या, "मला फक्त थोडा वेळ द्या. मी राहिलेले सर्व पैसे देईन."

किन्सीनी थोडा वेळा विचार केला आणि बाईंकडे नीट निरखून पहिले. ते हसतच बाईंना म्हणाले, "ठीक आहे. चेहऱ्यावरून तरी तुम्ही प्रामाणिक दिसता. तुम्ही पैसे बुडवणार नाही असं मला वाटतं."

किन्सीना अधिक काही बोलण्याची संधी न देता बाईंनी त्यांचे आभार मानले आणि त्या तिथून निघूनही गेल्या. त्याच दिवशी दुपारी बाई, त्यांच्या विद्यार्थिनी आणि इतर अनेक लोकांनी मिळून त्या जागेवरील तण आणि कचरा साफ करायला सुरुवात केली.

लोहमार्गाचे काम करणाऱ्या काही लोकांनी त्या जागेतील पाणी काढून टाकण्यास मदत केली. काही महिन्यांनी ती जमीन पूर्णपणे कोरडी आणि बांधकाम करण्याजोगी झाली. पण त्या इमारत बांधणार कशी? त्यासाठी पैसे कसे उभे करणार? हे बांधकाम कोण करून देईल?

## प्रकरण ५

## अखेर शाळा तयार झाली

शाळेच्या जुन्या जागेत बेथ्यूनबाईंनी डेटोना मधील काळ्या महिला आणि पुरुषांसाठी संध्याकाळच्या वेळी वर्ग घेण्यास सुरुवात केली. यापैकी काही लोक लोहमार्गाचे काम करत असत. इतर लोक सुतार, गवंडी, प्लंबर, माळी किंवा या सर्वांचे मदतनीस म्हणून काम करत असत. अशी विविध कौशल्ये असलेले लोक शाळा बांधायला मदत करू शकतील असे बाईंना वाटले. त्यांना कोणीतरी तशी विनंती करायला हवी होती. आणि बाईंनी ती केली.

हे सर्व कामगार मदत करायला अगदी खुशीने तयार झाले, पण आपले काम संभाळूनच त्यांना शाळा बांधावी लागणार होती.

दिवसा उजेडी जेवढी सवड मिळेल, त्यात ते शाळेचे काम करणार होते. तरीही बेथ्यूनबाईंना पूर्णवेळ बांधकाम करणाऱ्यांची गरज होतीच. परंतु, त्यांच्या स्वयंसेवकांनी कामाला सुरुवात तर केली. हळू हळू त्यांच्या प्रौढ विद्यार्थ्यांनी जमीन खणून विटांचे बांधकाम करायला सुरुवात केली. त्यांनी लाकूड कापले आणि नळ ही घातले. शाळेच्या भिंती आता वर चढू लागल्या होत्या.

बाई आणि त्यांचे विद्यार्थी समूहगीते गाऊन पैसे जमवण्याचे काम करतच होते. “पाय” आणि आईसक्रीम बनवून विकण्याचे कामही चालू होतेच. परंतु तरीही त्या पैशातून शाळेच्या इमारतीसाठी वाळू, विटा, काचा, नळ वगैरे सर्व साहित्य विकत घेण्याचा खर्च भागणे शक्यच नव्हते. पूर्ण वेळ बांधकाम करणाऱ्या लोकांनाही पैसे द्यावे लागणार होते.

आता आणखी पैसे मिळवण्यासाठी नवे मार्ग शोधण्याचा बाई विचार करू लागल्या. गावातील खूप श्रीमंत असणाऱ्या काही गोऱ्या लोकांकडे त्या अद्याप गेल्या नव्हत्या. श्री. जेम्स गॅम्बल यांच्यासारख्या नेहमी अमेरिकेच्या उत्तर भागात राहणाऱ्या काही लोकांनी हिवाळ्यात राहण्यासाठी डेटोना बीच मध्ये घरे बांधलेली होती. कदाचित त्यांच्यापैकी काही जण शाळेचे विश्वस्त होण्यास तयार होतील - आणि शाळा चालवण्यास मदत करतील?



एक दिवशी दुपारच्या वेळी बाई गॅम्बल यांच्या मोठ्या आलिशान घराकडे आपल्या सायकलीवरून निघाल्या.

"इथे ज्या बाई शाळा बांधण्याच्या प्रयत्नांत आहेत, त्या तुम्हीच का?" असे गॅम्बलनी त्यांना विचारले. त्याचे होकारार्थी उत्तर देऊन बेथ्यूनबाईंनी त्यांना शाळेची माहिती दिली आणि त्यांना शाळा पाहण्यास येण्याचे आमंत्रण दिले. पैशाविषयी त्या काहीच बोलल्या नाहीत. ते नंतरही  करता येईल. अगोदर त्यांना शाळा प्रत्यक्ष पाहू तर द्यावी असा त्यांनी विचार केला.

थोड्या दिवसांनी गॅम्बल जुन्या लाकडी शाळेत आले. त्यावेळी सर्वांचे "पाय" बनवण्याचे काम चाललेले होते. बेथ्यूनबाईंनी त्यांचे स्वागत केले आणि त्यांना लाकडी घरातील आणि गोदामातील अशा दोन्ही शाळा फिरून दाखवल्या. शाळेत मुले बाक म्हणून वापरत असलेली खोकी आणि पुठ्ठ्याचे  डबे त्यांनी पाहिले. पेन्सिल म्हणून वापरत असलेल्या जळक्या काड्या त्यांना दिसल्या. नव्या इमारतीच्या अर्धवट झालेल्या भिंतीही दिसत होत्या.

बेथ्यूनबाईंची ही शाळा त्यांनी आतापर्यंत पाहिलेल्या कोणत्याही शाळेसारखी दिसत नव्हती. ते गोंधळून काहीशा काळजीत पडले.

"तुम्ही मला सांगितलीत  ती शाळा कुठे आहे?" त्यांनी विचारले.



बेथ्यूनबाईंचे करड्या रंगाचे डोळे चमकू लागले, हसतच त्यांनी हाताची घडी घातली. एक हात आपल्या हृदयावर ठेवून त्या आत्मविश्वासाने म्हणाल्या, “माझ्या मनातील एका फार मोठ्या स्वप्नाचे तुम्ही विश्वस्त व्हावे अशी मी तुम्हाला मनापासून विनंती करते. माझ्या लोकांसाठी माझ्या मनात आणि हृदयात जे स्वप्न आहे त्याचे विश्वस्त.”

मेरी बेथ्यून यांच्या डोळ्यात चमकणारी आशा आणि त्यांचा दृढनिश्चय हे दोन्ही गॅम्बल यांच्या लक्षात आले. काही झाले तरी त्या शाळा बंधातीलच याची त्यांना खात्री वाटली.

म्हणून मग गॅम्बल यांनी विश्वस्त होण्याचे कबूल केले. शाळेसंबंधीचे निर्णय घेण्यासाठी मेरी बेथ्यून आणि इतर मंडळींना भेटण्याचे त्यांनी कबूल केले. आता ते सर्वजण मिळून शाळा पूर्ण करण्याची जबाबदारी घेत होते. डेटोनामधील काळ्या मुलांच्या शिक्षणासाठी पुरेशा रकमेची ते तरतूद करणार होते.

त्यांनतर गॅम्बलनी १५० डॉलर्सचा चेक लिहिला आणि तो बेथ्यून बाईंच्या हातात दिला. त्या चेकवर लिहिलेली रक्कम पाहून त्यांचा चेहरा आंनदाने फुलला आणि त्यांनी हस्तांदोलन केले. एका चांगल्या भागीदारीची ही सुरुवात होती.

ऑक्टोबर १९०७ पर्यंत शाळेच्या नव्या चार माजली इमारतीचे छत बांधून तयार झाले होते. परंतु अद्याप आतील बरेच काम बाकी होते. जमीन रिकामी होती, बऱ्याच खिडक्या अद्याप लावण्यात आल्या नव्हत्या. परंतु, तरीही मुलींना नव्या जागेत आणायचे असे बाईंनी ठरवले आणि वर्ग आता तिथे भरू लागले.

नव्या इमारतीला त्यांनी नाव दिले “फेथ हॉल”. शाळेच्या मुख्य दरवाजावर लावलेल्या पाटीवर लिहिले होते, “शिकण्यासाठी या” त्याच्याच आतल्या बाजूला जी पाटी होती त्यावर लिहिले होते “सेवेसाठी बाहेर पडा”.

आपल्या विद्यार्थ्यांनी कसून अभ्यास करावा आणि त्याचा इतरांना मदत करण्यासाठी उपयोग करावा अशी बेथ्यूनबाईंची इच्छा होती. त्यांनी स्वतः तेच केले होते. अनेक लोकांच्या मदतीने- त्यात गरीब-श्रीमंत, काळे-गोरे सर्व होते- त्यांनी लोकांना उपयोग व्हावा म्हणून ही शाळा उभारली होती. कालांतराने त्या म्हणाल्या, “बऱ्याच लोकांना वाटते की मी फार स्वप्ने पाहते...
पण स्वप्नांमधूनच अनेक गोष्टी प्रत्यक्षात आणता येतात.”

# समारोप

१९१४ पर्यंत, म्हणजे केवळ दहाच वर्षांत, बेथ्यूनबाईंची शाळा पूर्णपणे उच्च माध्यमिक शाळा झाली होती. संपूर्ण फ्लोरिडा राज्यात काळ्या मुलांसाठी त्या वेळी केवळ आणखी एकच उच्च माध्यमिक शाळा होती.

शाळेच्या समोरच्या बाजूला बेथ्यूनबाईंनी आणखी जमीन खरेदी केली आणि तेथे एक मळा सुरु केला. विद्यार्थी त्या मळ्याची आणि तेथील जनावरांची देखभाल करत असत. तेथील उत्पादनाचा काही भाग ते खाण्यासाठी वापरत आणि बाकीचा विकून मिळालेले पैसे शाळेसाठी वापरले जात. आपल्या विद्यार्थ्यांप्रमाणेच त्यांना शाळा देखील स्वावलंबी बनवायची होती.

शाळेचा अभ्यासक्रम पूर्ण करून विद्यार्थिनी जेव्हा बाहेर पडत तेव्हा त्यांना स्वयंपाक, आजाऱ्यांची शुश्रूषा, गृहव्यवस्थापन आणि शिकवणे या सर्व गोष्टींचे प्रशिक्षण मिळालेले असे. त्यांना नोकरी मिळत असे आणि इतरांना शिकण्यासाठी मदतही करता येत असे. कालांतराने ही शाळा मुलांच्या शाळेशी निगडित करण्यात आली आणि ती ‘बेथ्यून-कुकमन कॉलेज’ या नावाने ओळखली जाऊ लागली. मेरी बेथ्यून या कॉलेजच्या पहिल्या अध्यक्ष होत्या.

.

मेरी बेथ्यून यांचे १९५५ मध्ये निधन झाले, पण त्यांनी सुरु केलेली शाळा आजदेखील अस्तित्वात आहे. फ्लोरिडाच्या सुपीक जमिनीवर 'बेथ्यून-कुकमन कॉलेज'च्या अनेक मोठ्या इमारती अनेक एकरांवर पसरल्या आहेत. दरवर्षी सुमारे २,३०० मुले आणि मुली तेथे शिक्षण घेतात

# उपसंहार

मेरी मॅक्लियोड बेथ्यूनने शाळेच्या उभारणीला सुरुवात केली त्यावेळी त्या कोणी प्रसिद्ध व्यक्ती नव्हत्या. त्यामुळे वृत्तपत्रांच्या वार्ताहरांनी आणि इतिहासकारांनी दरवेळी त्या कुठे काय बोलल्या याची नोंद केली नव्हती. त्यांची शाळा स्थापन झाल्यावर आणि आफ्रिकी वंशाच्या अमेरिकन नागरिकांच्या त्या प्रवक्त्या झाल्यानंतरच त्यांची नोंद घेतली जाऊ लागली.

बेथ्यूनबाईंची गोष्ट लिहिताना त्यांच्या कामाची सुरुवात होऊन बरीच वर्षे गेल्यानंतर त्यांचे चरित्र व आठवणी लिहिल्या गेल्या, त्यावरच आम्हाला विसंबावे लागले. त्यांचे शब्द, विचार, आणि कृती याबद्दल त्यात जे लिहिले आहे त्याचाच आम्ही आधार घेतला आहे. त्यांचे जे शब्द अवतरण चिन्हांत दिले आहेत, ते या पुस्तकांतून घेतलेले आहेत.

# टिप्पणे

**पृष्ठ ३ :** अमेरिकेच्या दक्षिणेकडील अनेक राज्यांमध्ये 'जिम क्रो लॉज' नावाचे कायदे अस्तित्वात होते. त्यानुसार गोऱ्या वर्णाच्या आणि आफ्रिकी वंशाच्या अमेरिकन लोकांसाठी उद्याने, शाळा, पाणी पिण्याचे नळ, आगगाडीचे डबे इतकेच नव्हे तर टेलिफोन बूथ अशांसारखी सार्वजनिक ठिकाणे निरनिराळी असत. साधारणपणे १८८० ते १९६० पर्यंत हे कायदे अस्तित्वात होते.

**पृष्ठे ३-४**: दक्षिणेकडील राज्यांमध्ये काळ्या मुलांसाठी प्राथमिक शाळा विखुरलेल्या होत्या. त्यापैकी बहुतेक शाळांकडे साधनसामुग्री घेण्यासाठी फारच थोडे पैसे होते आणि त्या वर्षातील ३-४ महिनेच चालवल्या जात. १८८२ साली दक्षिण कॅरोलिना राज्यात सुमारे अर्ध्याच गावांमध्ये काळ्या मुलांसाठी शाळा होत्या. मेसव्हील मध्ये मात्र १८८६ पर्यंत काळ्या मुलांसाठी एकही शाळा नव्हती.

**पृष्ठ ६**: श्रीमती बेथ्यूनना काळ्या मुलांसाठी शाळा उघडण्यात जेवढे स्वारस्य होते तेवढे श्रीयुत बेथ्यून यांना नव्हते. पण तरीही त्यांचे स्वप्न साकार करण्यासाठी डेटोना बीच येथे जाण्यासाठी त्यांनी आपल्या पत्नीला प्रोत्साहन दिले. शाळा जसजशी वाढू लागली, तसे श्रीमती बेथ्यून आपला सर्व वेळ इतरांना मदत करण्यासाठी देतात आणि त्यांना पत्नी व आई म्हणून जगण्यासाठी फारसा वेळच नाही हे त्यांच्या लक्षात आले. मग ते एकटेच दक्षिण कॅरोलिनाला परत गेले आणि तेथे १९१९ मध्ये त्यांचे निधन झाले.

**पृष्ठ ११**: अमेरिकेतील उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील अनेक राज्यांतील आफ्रिकी अमेरिकन लोक राहत असलेल्या वस्त्या डेटोना बीच सारख्याच गरीब आणि विशेष सोयी - सुविधा नसलेल्याच होत्या.

राज्य सरकारे गोऱ्या लोकांच्या भागात काळ्या लोकांच्या वसाहती असलेल्या भागापेक्षा अधिक पैसे खर्च करत असत. उदाहरणार्थ, दक्षिण कॅरोलिनात सरकारी शाळेतील प्रत्येक गोऱ्या मुलामागे १३.९५ डॉलर्स खर्च केले जात असत, तर काळ्या मुलासाठी केवळ २.५७ डॉलर्स खर्च केले जात असत.

**पृष्ठ ११**: अनेक शहरांत आणि राज्यांमध्ये आफ्रिकी वंशाच्या अमेरिकन लोकांना मतदान करण्याची परवानगी नव्हती म्हणूनही स्थानिक व राज्य सरकारे त्यांना मदत करत नसत. विशेषतः दक्षिणेकडील राज्यांमध्ये गोऱ्या राजकारण्यांनी विशेष नियम आणि कर लावून काळे लोक मतदान करू शकणार नाहीत याची तजवीज केली होती. (याकाळी गोऱ्या अथवा काळ्या महिलांना मतदानाचा अधिकार नव्हता.)

या नियमांनुसार, मत देण्यासाठी प्रत्येक पुरुषाला लिहिण्या-वाचण्याच्या एका कठीण परीक्षेत पास व्हावे लगे, त्याच्या नावे मालमत्ता असल्याचे दाखवावे लागे किंवा तो कर भरत असल्याचा पुरावा द्यावा लागे. या नियमामुळे काही गरीब गोऱ्या लोकांनाही मतदान करता येत नसे. मग राजकारण्यांनी यात एक कलम घातले की ‘ज्यांचे नातेवाईक १ जानेवारी १८६७ पूर्वी मतदान करू शकत असल्याचा पुरावा असेल’ त्यांना मतदान करता येईल. त्या तारखेपूर्वी

दक्षिणेकडील राज्यांमध्ये आफ्रिकी अमेरिकन लोकांना मतदान करता येत नसे, म्हणून त्यांच्या नातेवाईकांनाही १८९५ ते १९१० पर्यंत मतदान करता येणे शक्य नव्हते. हे  कलम 'ग्रँडफादर क्लॉज' (आजोबांचे कलम ) म्हणून ओळखले जात असे.

**पृष्ठ १६**: बेथ्यूनबाईंची शाळा सरकारी शाळा नव्हती. डेटोना बीचचे  स्थानिक प्रशासन किंवा फ्लोरिडाचे राज्य सरकार  ही शाळा चालवत नसे किंवा तिचा खर्चही करत नसे. बाईंना ती खाजगी शाळाच ठेवायची होती म्हणजे शाळेत काय काय शिकवायचे हे त्या ठरवू शकत होत्या. शेतीसाठीची कौशल्ये किंवा शिवणकाम हे विषय सरकारी शाळेत शिकवत नसत, परंतु ते विषय शिकणे गरजेचे आहे असे त्यांचे मत होते.

**पृष्ठ २३**:  बेथ्यूनबाईंची शाळा सुरु झाली तेव्हा त्यांचा मुलगा अल्बर्ट हा त्या शाळेत शिकणारा एकमेव मुलगा होता. १९०८ साली जॉर्जिया राज्यातील ऍटलांटा येथे मिस लेनी यांच्या शाळेत मुलग्यांना प्रवेश देण्यास सुरुवात झाल्यावर शिकण्यासाठी तो तेथे गेला.

**पृष्ठ ४०**: १९१६ सालच्या सुमारास देखील संपूर्ण अमेरिकेत आफ्रिकी अमेरिकन वंशाच्या मुलांसाठी केवळ ६७ सरकारी शाळा होत्या. त्याकाळी  आफ्रिकी वंशाची जेमतेम २०,००० मुले उच्च माध्यमिक शाळेत शिकत होती. आफ्रिकी वंशाची बहुतेक मुले केवळ प्राथमिक शाळेतील चौथीपर्यंतच शिकत असत.

रिचर्ड केल्सो न्यूयॉर्क मध्ये राहतात. 'करिक्युलम कॉन्सेप्ट्स' मध्ये (अभ्यासक्रम विषयक संस्था) ते काम करतात. 'डेज ऑफ करेज' व 'स्टोरीज ऑफ अमेरिका' या मालिकेतील 'वॉकिंग फॉर फ्रीडम' या पुस्तकांचे ते लेखक आहेत.

# स्वप्न साकार करताना

## मेरी बेथ्यूनची शाळा

१९०४ साली मेरी मक्लिओड बेथ्यून फ्लोरिडातील डेटोना बीच मध्ये आल्या, तेव्हा त्यांच्या मनात होते एक स्वप्न आणि खिशात होते एक डॉलर आणि ५० सेंट. अमेरिकेतील दक्षिणेकडील राज्यांमधील वांशिकदृष्ट्या विभागलेल्या समाजातील आफ्रिकी वंशाच्या अमेरिकन मुलांचे भविष्य शिक्षणाच्या माध्यमातून उज्ज्वल करण्याचे त्यांचे स्वप्न होते.